सन २०१६-२०१७ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय अनुदाने ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, गारगोटी, जि.कोल्हापूर यांना देण्यात यावयाच्या अनुदानाचे वाटप मागणी क्र. एल -३ (योजनेत्तर)(दत्तमत)
(संकेतांक क्र.२४१५ ०३२१)
(तिसरा हप्ता) ( माहे जानेवारी ते मार्च,२०१७)

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः अनुग्रा २०१६/प्र.क्र. ७० /योजना-४
बांधकाम भवन, तळ मजला, २५, मर्झबान पथ, फोर्ट,
मुंबई- ४०० ००१.
तारीखः ०४ मार्च, २०१७

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांकः ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण-२०९३/प्र.क्र. ८४५/०९, दि.१७.०९.१९९३.
२) शासन निर्णय क्रमांकः ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक- प्रशिक्षण ११९९/प्र.क्र.५८१/६१, दिनांक २३.०९.१९९८.
३) शासन निर्णय क्रमांकः ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक-प्रशिक्षण-२०००/ प्र.क्र.८५९/४४, दि.१२.६.२००१.
४) शासन निर्णय क्रमांकः ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक- अनुग्रा २०१६/प्र.क्र. ७० /योजना-४, दि.२८.०४.२०१६
५) शासन निर्णय क्रमांकः ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक- अनुग्रा २०१६/प्र.क्र. ७० /योजना-४, दि.२७.०७.२०१६

शासन निर्णय :-

मुख्य लेखाशिर्ष मागणी क्र. एल -३-२४१५, कृषिविषयक संशोधन व शिक्षण (०१) (०२) कोल्हापूर जिल्ह्यातील गारगोटी येथे ग्राम सेवक प्रशिक्षण केंद्र स्थापन करणे व त्याचा दर्जा वाढविणे (संकेतांक क्र.२४१५ ०३२१),(योजनेत्तर)(दत्तमत) अंतर्गत ग्राम सेवक प्रशिक्षण केंद्र,गारगोटी, जिल्हा कोल्हापूर यांना वेतनेतरसाठी रुपये १०.०० लक्ष (रु.दहा लक्ष) व वेतनासाठी रुपये ६७.७८ लक्ष (रु.सदुसष्ट लक्ष, अठ्यात्तर हजार) असे एकूण रुपये ७७.७८ लक्ष (रु.सत्यात्तर लक्ष, अठ्यात्तर हजार) इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आलेली आहे.

२. सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाच्या माहे एप्रिल-मे,२०१६ या कालावधीकरिता वेतनेतरकरिता रु.१.६६ लक्ष (रु.एक लक्ष, सहासष्ट हजार) व वेतनासाठी रु.१०.०० लक्ष (रु.दहा लक्ष) असे एकूण रु.११.६६ लक्ष (रु.अकरा लक्ष, सहासष्ट हजार) इतके अनुदान दि.२८ एप्रिल, २०१६ च्या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आले आहे. तसेच, माहे जून ते डिसेंबर,२०१६ या कालावधीसाठी वेतनेतरकरीता अर्थसंकल्पिय तरतूदीप्रमाणे रु.५.०० लक्ष (रु.पाच लक्ष) व वेतनासाठी त्यांनी मागणी केल्याप्रमाणे रु.३६.०८ लक्ष (रु.छत्तीस लक्ष, आठ हजार) असे एकूण रुपये ४१.०८ लक्ष (रु.एक्केचाळीस लक्ष, आठ हजार) इतके अनुदान ग्राम सेवक प्रशिक्षण केंद्र,गारगोटी, जिल्हा कोल्हापूर यांना दि.२७ जुलै,२०१६ च्या शासन निर्णयान्वये दुसरा हप्ता म्हणून वितरीत करण्यात आले आहे.

३. आता, माहे जानेवारी ते मार्च,२०१७ या कालावधीकरिता वेतनेतरकरिता अर्थसंकल्पिय उपलब्ध तरतुदीप्रमाणे रु.२.३४ लक्ष (रु.दोन लक्ष, चौतीस हजार) व वेतनासाठी मागणी केल्याप्रमाणे रु.१६.५३ लक्ष (रु.सोळा लक्ष, त्रेप्पन्न हजार) असे एकूण रु.१८.८७ लक्ष (रु.अठरा लक्ष, सत्याऐंशी हजार) इतके अनुदान ग्राम सेवक प्रशिक्षण केंद्र,गारगोटी, जिल्हा कोल्हापूर यांना या शासन निर्णयान्वये तिसरा हप्ता म्हणून वितरीत करण्यात येत आहे.

४. प्रशिक्षण केंद्राना अनुदान द्यावयाच्या कार्यपध्दतीबाबत शासन परिपत्रक क्र.प्रशिक्षण ११९८/ प्र.क्र.५८१/६१, दिनांक २३ सप्टेंबर १९९८ व शासन परिपत्रक ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. प्रशिक्षण २०००/ प्र.क्र.८५९ /४४, दिनांक १२ जून, २००१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांच्या अनुषंगाने संबंधित उपायुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय यांनी सदर प्रशिक्षण केंद्रास अनुदान अदा करण्याबाबत त्वरीत कार्यवाही करावी. तसेच संदर्भ क्रमांक १ येथे दर्शविलेल्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. १२ मधील अटीनुसार केंद्रानी खर्च करावा.

५. विभागीय आयुक्त कार्यालयाने ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रास दरमहा अनुदान वितरीत करताना वेतन व वेतनेतर बाबीवर प्रत्यक्ष किती अनुदानाची आवश्यकता आहे याची खातरजमा करुन त्यांना आवश्यक तेवढी रक्कम उपलब्ध करुन द्यावी. मात्र उपरोक्त नमूद केलेल्या अनुदानापेक्षा जास्त अनुदान वितरीत केले जाणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र यांनी वेतन/वेतनेतर खर्चाकरिता दरमहा किती अनुदान आवश्यक आहे, याची पूर्वसूचना संबंधित आयुक्त कार्यालयास द्यावी. त्याप्रमाणे आयुक्त कार्यालयाने वेतन/वेतनेतर खर्चाकरिता अनुदान वितरीत करावे. आवश्यक असलेल्या अनुदानाबाबत पूर्वसूचना न दिल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित प्रशिक्षण केंद्रांच्या प्राचार्यांची असेल.

६. हा खर्च मागणी क्र. एल -३-२४१५, कृषिविषयक संशोधन व शिक्षण (०१) (०२) कोल्हापूर जिल्ह्यातील गारगोटी येथे ग्राम सेवक प्रशिक्षण केंद्र स्थापन करणे व त्याचा दर्जा वाढविणे (संकेतांक क्र.२४१५ ०३२१), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर), ३६ सहायक अनुदाने (वेतन) (योजनेत्तर)(दत्तमत)

अंतर्गत खर्ची टाकण्यात यावा आणि तो यावर्षीच्या लेखाशिर्षांतर्गत केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. तसेच सदर खर्च त्याच संकेतांकाखाली खर्च पडतो आहे याबाबत ताळमेळ घालून खातरजमा करावी व विभागीय आयुक्तांनी दरमहा शासनास कळवावे.

७. या अनुदानातून संबंधित प्रशिक्षण केंद्राने केलेल्या खर्चाचे स्वंतत्र लेखे व पुस्तके तपासण्याचा अधिकार महालेखापाल, (लेखा) महाराष्ट्र-१ मुंबई आणि/किंवा महालेखापाल (लेखा) महाराष्ट्र-२ नागपूर यांना राहील व त्यांना त्यांचे हे काम योग्यतऱ्हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित प्रशिक्षण केंद्र / संस्था, मदत / सुविधा पुरवतील.

८. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग १ ला, उपविभाग १ ते ५ मधील तरतूदीनुसार शासन निर्णय दिनांक १५/५/२००९ सोबतच्या उप विभाग - ३ मधील अ.क्र. १ परि. १६२, १६३, १६४ नुसार प्रशासकिय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करून व वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक ०८ फेब्रुवारी,२०१७ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०४१५२५१०२८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajendra Mahadev Gengaje

Digitally signed by Rajendra Mahadev Gengaje
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=aadac6f62a04dc76f59a0a873d1263c7d14f6ea5080bb750bf392303a1a35907, cn=Rajendra Mahadev Gengaje
Date: 2017.03.04 15:42:28 +05'30'

( रा. म. गेंगजे )
अवर सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे. (प्रत्येकी२ प्रती)
२. उप आयुक्त (आस्था) (विकास) शाखा, विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे
३. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर,
४. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १, मुंबई
५. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र -२, नागपूर

६. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे
७. उपमहासंचालक, राज्य ग्रामीण विकास संस्था (यशदा) बाणेर रोड, पुणे
८. वित्त विभाग, कार्यासन क्र.अर्थ-१७/व्यय-१५
९. प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, गारगोटी, कोल्हापूर
१०. कार्यासन क्र. वित्त-१, वित्त-६, वित्त-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग (२ जादा प्रतींसह.
११. निवड नस्ती का.क्र. योजना-४, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.